e14

जिल्हा परिषद पदाधिकारी व
अधिकारी यांच्यात समन्वय.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**
शासन परिपत्रक क्रमांक पंरास १०/प्र.क्र.११९/२००१/का.५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- २५ सप्टेंबर, २००१ .

**पार्श्वभूमी :**

पंचायत राज समिती प्रमुख व सदस्यांनी त्यांच्या जिल्हा परिषद भेटीच्या वेळी आलेल्या अनुभवावरुन विभागाच्या असे निदर्शनास आणले आहे की, जिल्हा परिषदा व पंचायत समित्या या दोन्ही स्तरावर पदाधिकारी व अधिकारी यांच्यामध्ये योग्य समन्वय नाही. त्यामुळे विकास कामांवर विपरीत परिणाम होतो. ७३ व्या घटना दुरुस्तीनंतर पंचायत राज संस्थांनी जिल्हा विकासाच्या प्रमुख संस्था म्हणून कार्य करणे अपेक्षित आहे. त्या दृष्टीने त्यांना सक्षम व बळकट करण्याची गरज आहे. जिल्हा परिषदेचा व पंचायत समित्यांचा कारभार कसा चालवावा याबाबत शासनाने कांही मार्गदर्शक नियमही तयार केले आहेत. या सर्वांचा विचार करुन जिल्हा परिषदा व पंचायत समित्यांना पुन्हा सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**परिपत्रक**

राज्यातील जिल्हा परिषदा व पंचायत समित्यांनी त्यांची जबाबदारी योग्य रितीने पार पाडावी व आपल्या जिल्हयाच्या व पर्यायाने जनतेचाही विकास व्हावा या दृष्टीने जिल्हयातील संस्थाचे पदाधिकारी व शासकीय अधिकारी यांनी परस्पर सहकार्याने, सामंजस्यांने काम करणे आवश्यक आहे. यासाठी पदाधिकारी व अधिकारी यांच्यात विचार विनिमय व विचारांची देवाणघेवाण अपेक्षित आहे. वेळेच्या सुविधे नुसार जिल्हा परिषदांच्या विहित बैठकांव्यतिरिक्त दर १-२ महिन्या दरम्यांने पदाधिकारी व अधिकारी यांची समन्वय बैठक बोलावण्यात यावी व अशा बैठकीमध्ये जिल्हयांच्या विकास कामांच्या अडचणीवर/प्रश्नावर सविस्तर चर्चा व्हावी. सदर चर्चेमध्ये कामांचा आढावा,कामाचे नियोजन, आर्थिक बाबी, उपलब्ध निधी, जिल्हा परिषद स्वउत्पन्नामध्ये झालेली प्रगती, उत्पन्न वाढीसाठीच्या उपाययोजना, जिल्हा परिषद व शासन यामधील येणी-देणी व त्याबाबत करावयाच्या उपाययोजना, आर्थिक व प्रशासकीय बाबतीमधील येणा-या विविध अडचणी व त्याबाबत करावयाची कार्यवाही इत्यादी विषयावर सविस्तर चर्चा व्हावी. यामुळे विकास कामांतील सर्व घटकांची माहिती लोकप्रतिनिधी व अधिकारी यांना होईल. अशा बैठका आयोजित करण्यासाठी अध्यक्ष, जिल्हा परिषद व संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी पुढाकार घ्यावा.

या समन्वय बैठकांमधून जिल्हयातील विकास कामे करण्याचे परस्परांचे मनोबल वृध्दींगत व्हावे व ती विकास कामे आत्मीयतेने पार पाडली जातील याची कटाक्षाने दक्षता घ्यावी. याबाबत पदाधिकारी व अधिकारी यांना येणा-या अडचणी बाबत त्यांनी शासनाशी संपर्क साधावा.

शासनाच्या वरील सूचनांची अमंलबजावणी व पालन जिल्हा परिषद/पंचायत समितीमधील पदाधिकारी व अधिकारी यांनी करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( कुंदा गोसावी )
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रती,

सर्व विभागीय आयुक्त,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा,
सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष, ( पत्राने )
सर्व सभापती, पंचायत समिती (पत्राने )
मा. सचिव, पंचायत राज समिती, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई यांजकडे माहितीकरिता रवाना

A.cr-119-gr-

**महाराष्ट्र शासन**
ग्रामविकास व जलसंधारण विभाग,
शासन परिपत्रक क्रः- झेडपीए २००९/प्र.क्र ५०५/वित्त-९
मंत्रालय, मुंबई-४०००३२, दिनांक :- ६ ऑगस्ट,२००९

वाचा:- १) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय, क्रमांक:भाखंस१०८८/(२५१२)/उद्योग -६ , दिनांक २ जानेवारी,१९९२
२) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय, क्रमांक भाखंस -२००२ /(२९९०) /उद्योग-६, दिनांक ४ फेब्रुवारी, २००३
३) क्र. झेडपीए २००८/प्र.क्र ४७०/वित्त-९, दिनांक :- २९ डिसेंबर,२००८ चे पत्र.

**परिपत्रक**

शासनाने शासकीय कार्यालयांना लागणा-या वस्तु खरेदीचे धोरण निश्चित करून सर्व शासकीय /निमशासकीय विभाग, मंडळे, महामंडळे, नगरपालिका, महानगरपालिका, शासकीय उपक्रम, संस्था, स्वायत्तसंस्था, **जिल्हा परिषदा,** नगरपरिषदा, सार्वजनिक उपक्रम यांना आवश्यक असलेल्या वस्तूंच्या खरेदी संदर्भात कार्यवाही करण्याच्या **सर्वकष सूचना** उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये दिलेल्या आहेत. असे असूनही अद्यापही काही जिल्हा परिषदा या शासन निर्णयातील **तरतुदींचे पालन करीत नाहीत** वा शासनाकडे त्यांना आवश्यक असलेल्या वस्तू बाजार भावाने खरेदी करण्यास मान्यता देण्याविषयी वारंवार मान्यता वा शासनाकडून मार्गदर्शन मागवित असतात, असे शासनाच्या निदर्शनास आले आहे.

या संदर्भात आता सर्व जिल्हा परिषदांना पुन्हा एकदा सूचना देण्यात येत आहे की, भांडार खरेदी संघटनेकडून करण्यात येणा-या दर निश्चितीचे दर संपुर्ण राज्यासाठी असून स्थानिक बाजारपेठेतील दरापेक्षा हे दर काही अंशी अधिक असण्याची शक्यता नाकारता येत नाही. **शासनाच्या खरेदी धोरणानुसार, केवळ वस्तुंचे दर हा महत्वाचा मुद्दा नसून, समाजाच्या उपेक्षित वर्गासाठी कार्य करणा-या संस्थांना आरक्षणाच्या माध्यमातून स्थायी रोजगार मिळवून देण्याची व**

ROTA | H 1344 (250-8-09)1
(क्रू. मा. प.

**शासकीय/निमशासकीय खरेदीद्वारे स्थानिक उद्योजक /व्यापारी यांना बाजारपेठ मिळवून देणे अशी शासनाची व्यापक भूमिका आहे.** म्हणून बाजारातील दर हे दरकरारापेक्षा कमी असले तरीही उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचा दि. २/१/९२ चा शासन निर्णय व तद्अनुषंगाने शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय, शासन परिपत्रक व शासन पत्र या अन्वये दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार कार्यवाही करणे बंधनकारक आहे.

सदरिल परिपत्रक उद्यो, ऊर्जा व कामगार विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

उपरोक्त शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्रमांक २००९०८०६१२१०४०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सा. प्र. विचारे )
लेखा अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,
उद्योग सहसंचालक, उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन विभाग, २ रा मजला, मंत्रालयासमोर,मुंबई-३२
महालेखाकार ( लेखा व अनुज्ञेयता ) / ( लेखा व परिक्षा ) महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखाकार ( लेखा व अनुज्ञेयता ) / ( लेखा व परिक्षा ) महाराष्ट्र-२, नागपूर.
वित्त विभाग,व्यय-१५ व अर्थसंकल्प-१९.
सर्व विभागीय आयुक्त ( विकास शाखा )
मुख्य लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा कोकण भवन, नवी मुंबई
उप मुख्य लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा नवी मुंबई,पुणे,नाशिक,औरंगाबाद,नागपूर,अमरावती
सह मुख्य लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा नवी मुंबई,पुणे,नाशिक,औरंगाबाद,नागपूर,अमरावती
सर्व जिल्हा परिषदाचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व जिल्हा परिषदाचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
सर्व जिल्हा लेखा परिक्षक अधिकारी स्थानिक निधी लेखा
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,का.क्र.१३,१५,२३,२४,२५,२७ व २९
निवड नस्ती, कार्यासन क्रमांक वित्त-९

H 1344-1 अ